राज्य सेतू सोसायटीकडे आणि जिल्हा सेतू सोसायटीकडे जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान)

**शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंसं०१७/२९/२०२४/E-७३८७९८**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ०७ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.सिओएम १००२/प्र.क्र.२४०/०२/३९, दि. २३ ऑगस्ट, २००२.

२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. मातंसं/नस्ती ०७/३७/३९, दि. १० ऑक्टोबर, २०११.

३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. मातंसं-२०१२/सीआर-८७/३९, दि. ०३ मार्च, २०१२.

**प्रस्तावना :-**

जिल्हा सेतू सोसायटीकडे उपलब्ध होणाऱ्या निधीचा विनियोग तसेच जिल्ह्यातील सेतु केंद्रांच्या पायाभूत सुविधांमध्ये वाढ व त्या अनुषंगाने होणाऱ्या बाबींवर खर्च करण्याच्या उद्देशाने संदर्भ क्रमांक २ चा शासन निर्णय काढण्यात आलेला होता. परंतु राज्य सेतू सोसायटीकडे जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याबाबत अद्याप पर्यंत कोणतेही सुस्पष्ट धोरण आणि मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्यात आलेले नाही.

जिल्हा सेतु सोसायटी जास्त कार्यक्षम करण्यासाठी तसेच सर्व पातळीवर E – Governance प्रकल्प व विज्ञान आणि तंत्रज्ञान प्रकल्पाला चालना देण्यासाठी शासन नेहमी प्रयत्नशील आहे. त्याअनुषंगाने जिल्हा सेतू सोसायटीकडे जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याबाबतच्या सामान्य प्रशासन विभाग क्र. मातंसं/नस्ती ०७/३७/३९, दि. १० ऑक्टोबर, २०११ रोजीच्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब तसेच, राज्य सेतू सोसायटीकडे जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याबाबत सुस्पष्ट धोरण आणि मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याची बाब देखिल शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सेतू सोसायटीच्या दि. ०१ मार्च, २०२३ रोजी झालेल्या विशेष बैठकीत मान्य झाल्याप्रमाणे संदर्भ क्रमांक २ त्याअनुषंगाने जिल्हा सेतू सोसायटीकडे जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याबाबतच्या दि.१० ऑक्टोबर, २०११ रोजीच्या शासन निर्णयातील खर्चाच्या बाबींमध्ये काही बाबींचा समावेश करण्यात आला आहे. तसेच, वित्तीय अधिकारांमध्ये सूधारणा करण्यात आलेली आहे.

जिल्हा सेतू सोसायटीकडे शिल्लक राहणाऱ्या रकमेचा विनियोग खालीलप्रमाणे करावा.

| अ.क्र. | खर्च करावयाच्या रकमेची टक्केवारी | विनियोग/खर्चाच्या बाबी |
|---|---|---|
| १ | १० टक्के रक्कम | राज्यस्तरीय सेतू सोसायटीकडे वर्ग करण्यात यावी. |
| २ | १५ टक्के रक्कम | जिल्हा सेतू सोसायटीकडे राखीव निधी म्हणून ठेवण्यात यावी. |
| ३ | ७५ टक्के रक्कम | **अ) आवर्ती स्वरुपाचा खर्च**<br>१) संगणकासाठी पेपर स्टेशनरी.<br>२) प्रिंटर काट्रेज.<br>३) सी.डी.डिव्हीडी आणि पेन ड्राइव्ह इ. |

| | | |
|---|---|---|
| | | ४) संगणकीकरणाच्या तसेच सेतुच्या कामासाठी केलेले दौरे (TA-DA)<br>५) तालुकास्तरावरील सेतु सुविधा केंद्राच्या परीक्षणासाठी, जिल्हा सेतु केंद्राकडून झालेला TA/DA चा खर्च.<br>६) सेतू केंद्राच्या तपासासाठी वाहन भाड्याने घेणे किंवा तपासणीसाठी केलेला डिझेल, पेट्रोल वरील खर्च.<br>७) जिल्हाधिकारी यांचे मान्यतेनुसार भारतात कोठेही प्रशिक्षणात सहभाग (लोकप्रतिनिधी, शासकीय अधिकारी /कर्मचारी, महा ई-सेवा केंद्र VLE इ.)<br>८) सनदी लेखापालांचय लेखापरीक्षण अहवालावरील खर्च.<br>९) सेतू सभेसाठी चहापान.<br>१०) पावती पुस्तकांची छपाई.<br>११) विद्युत देयक (संगणक रुमचे)<br>१२) संगणक रुमचे दूरध्वनी देयक.<br>१३) सेतु संबंधित आवर्ती खर्चाच्या इतर बाबी.<br>१४) सिटीझन सेंट्रीक सेवेसाठी आवश्यक डिजिटायजेशन, डेटा एन्ट्री व स्कॅनिंग करीता झालेला खर्च.<br>१५) सेतु सुविधा केंद्रासाठी खरेदी केलेल्या संगणक व इतर सामग्रीचा वॉरेंटी कालावधी संपल्यानंतर करावयाचा देखभाल दुरुस्तीवरील खर्च.<br>१६) जिल्हा/तालुका सेतु केंद्रांमध्ये अभ्यागतासाठी विविध सुविधा पुरविणे.<br>**१७) सेतू संबंधीतील न्यायालयीन प्रकरणावरील खर्च.**<br><br>**ब) अनावर्ती स्वरुपाचा खर्च**<br><br>१) सेतु संबंधित अनावर्ती खर्चाच्या इतर बाबी.<br>२) संगणक खरेदी.<br>३) जर काही Mobile Applications विकसित करण्यात आले असतील तर रु. २५,००० पेक्षा कमी किंमतीचे Laptop / Tablet PC / Smart phone काही ठराविक अधिकाऱ्यांसाठी घेणे. त्याचप्रमाणे ३G / Internet Connection संबंधितांना उपलब्ध करुन देणे.<br>४) प्रिंटर्स / स्कॅनर / युपीएस / इनर्व्हटर / बारकोड रीडर / बायोमेट्रिक मशीन इत्यादी ची खरेदी.<br>५) लॅन कनेक्टीव्हीटी ने संगणक जोडणे.<br>६) जिल्हा व तालुका स्तरावरील विविध शासकीय कार्यालये / विभाग तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांची कार्यालये (जिल्हा परिषद, पंचायत समिती, नगरपालिका, नगर परिषद) याचेसाठी MS WAN Horizontal Connectivity वरील खर्च.<br>७) विविध विभागांचे कार्यालयासाठी MTNL किंवा BSNL कडून सवलतीच्या दरात Internet Connection घेणे.<br>८) Digital Signature Certificate खरेदी करणे.<br>९) संगणकासाठी आवश्यक असलेले फर्निचर. |

**१०) सेतू केंद्राचे सिव्हील मेनटेनंन्स (Furniture, Renovation संबंधीत बाबी.)**

**क)** E-Governance प्रकल्प

१) जिल्ह्यांच्या विविध विभागांची वेबसाईट तयार करणे व ती NSDL / NPCI पेमेंट गेटवेशी, CDAC SMS गेटवेशी जोडणे.

२) SSDG (State Service Delivery Gateway) सोबत जोडणे.

३) MS WAN / NIC चा Video Conferencing किंवा राज्य दर कराराप्रमाणे Video Conferencing साठी होणारा खर्च.

४) जिल्हास्तरावर संगणक प्रशिक्षण केंद्रासाठी (Civil / Electrical / LAN / Printer / PC / Internet इत्यादी प्रकारच्या पायाभूत सुविधा तयार करणे.)

५) जिल्हा स्तरावर इतर ई-गव्हर्नन्स प्रकल्पाचा खर्च.

६) नागरिकांना दिल्या जात असलेल्या सेवांमध्ये Data ज्या सर्व्हरवर आहे त्यांची देखरेख करणे व डेटा एन्ट्री आणि अपडेशन करणे यावर होणारा खर्च या निधीतून करता येईल.

७) महा ऑनलाईनमार्फत सेतू केंद्र आणि सी.एस.सी. साठी Uniform Software आणि सेवा तयार करण्यासाठी हा खर्च जिल्हा सेतू सोसायटीमार्फत करावा.

**८) ई- गर्व्हनन्स प्रकल्पासाठी हार्डवेअर खरेदी (PC, Laptop, Scanner, Printer, etc.,) व ई- गव्हर्नन्ससाठी Software खरेदी करणे/ विकसित करणे.**

**ड)** E-Governance **धोरण**

१) जिल्ह्याच्या विविध ठिकाणी प्रत्येक महिन्याचा पहिला शनिवार Tech शनिवार साजरा करणे.

२) E-Governance, Citizen Services शी संबंधित चर्चासत्रे आयोजित करणे.

३) वेबसाईटचे मराठी कंटेंट तयार करणे, त्यासाठी कंत्राटी स्वरुपात कंटेंट रायटर नेमणे.

४) जिल्हास्तरावर विविध विभागांची Website (संकेतस्थळ) तयार करण्यासाठी सुध्दा हा निधी वापरता येऊ शकेल. मात्र हे प्रकल्प आणि Website केंद्र व राज्यशासनाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या दर करार व Website Guidelines शी सुसंगत असावेत. सदर संकेतस्थळ तयार करताना त्याचे Security Certification करुन घ्यावे. तसेच त्यामध्ये मराठी Interface व UID सोबत सांगड घालावी.

५) ई-प्रशासन धोरणात नमूद केलेले प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी सुध्दा या निधीचा उपयोग करता येईल.

**ई) स्थानिक पातळीवर संशोधनाला उत्तेजन देण्यासाठी -**

शासकीय शाळा / महाविद्यालयात वैज्ञानिक प्रदर्शने, मेळावे यांचे आयोजन, वैज्ञानिक प्रयोगशाळा उभारणे, संगणक प्रयोगशाळा उभारणे (माहिती तंत्रज्ञान, UID, ई-गव्हर्नन्स) धोरणासाठी चर्चासत्रे (Conference) आयोजित करणे,

| | | |
|---|---|---|
| | | देशातील नामांकित शास्त्रज्ञांचे Lectures आयोजित करणे, मुलांना इंटरनेट वापराबाबत घ्यावयाच्या दक्षता या विषयांवर चर्चा सत्र आयोजित करण्यासाठी इ.<br>**फ) तांत्रिक मनुष्यबळाची नेमणूक**<br>तांत्रिक मनुष्यबळाची म्हणजे (Junior Programmer Engineer, Software Support Staff, Tally Operators, Data Entry Operators इत्यादी) यांची निवड जिल्हास्तरावर दर करार निश्चित करुन पात्र झालेल्या एजन्सी मार्फत करावी. वर नमूद अ ते इ मधील प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी या मनुष्यबळाचा उपयोग करता येईल. या निश्चित केलेल्या दर कराराचा अवलंब जिल्ह्यातील इतर कार्यालयांसाठी सुध्दा करता येऊ शकेल. |

**वर नमूद अनु. क्र. १, २ व ३ मध्ये दर्शविण्यात आलेली कार्यवाही अनिवार्य राहील. तसेच अनु.क्र. ३ नुसार खर्च करण्यासाठी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून जिल्हा सेतू सोसायटींना परवानगी देण्यात येत आहे.**

**"अ ते फ" मधील नमूद एका बाबीवरील खर्चास मान्यता देण्याचे अधिकार खालीलप्रमाणे आहे:-**

- **१० लाखापर्यंत - जिल्हाधिकारी तथा जिल्हा सेतू सोसायटीचे अध्यक्ष यांच्या मान्यतेने**
- **५० लाखापर्यंत - जिल्हा सेतू समितीच्या मान्यतेने.**
- **५० लाखांवरील - राज्य सेतू सोसायटीच्या मान्यतेने.**

**याशिवाय "अ ते फ" मधील नमूद बाबी व्यतिरिक्त काही बाबींवर खर्च करणे आवश्यक असल्यास त्याचा स्वतंत्र प्रस्ताव जिल्हा सेतू सोसायटीमार्फत पूर्वपरवानगीसाठी राज्य सेतू सोसायटीकडे पाठवावा.**

**तसेच अनु. क्र. २ नुसार जिल्हा सेतू सोसायटीकडे जमा राहणाऱ्या १५% राखीव निधीतून खर्च करण्यास राज्य सेतू सोसायटीची परवानगी आवश्यक राहील.**

राज्य सेतू सोसायटीच्या दि.२५ सप्टेंबर, २०२३ रोजी झालेल्या विशेष बैठकीत मान्य झाल्याप्रमाणे राज्य सेतू सोसायटीकडे जमा होणाऱ्या निधीच्या प्रभावी वापरासाठी धोरण आणि मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

राज्य सेतु सोसायटीकडे जमा होणाऱ्या निधीच्या प्रभावी वापरासाठी **धोरण आणि मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याबाबत खालीलप्रमाणे मान्यता देण्यात आलेली आहे.**

| अ.क्र. | खर्चाच्या बाबी | विनियोग/खर्चाच्या बाबी |
|---|---|---|
| १. | राज्य सेतु सोसायटीसाठी आवर्ती स्वरुपाचा खर्च | १. राज्य सेतु सोसायटीच्या दैनंदिन कामकाज करण्यासाठी कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांचे वेतन व अनुज्ञेय भत्ते अदा करणे,<br>२. कार्यालयीन कामकाजासाठी आवश्यक असणारी स्टेशनरी,<br>३. कार्यालयासाठी लागणारा खर्च करणे (विजेचे बिल, टेलिफोन बिल इ.)<br>४. राज्य सेतु सोसायटीच्या कामकाजासाठी अधिकारी व कर्मचाऱ्यांचा होणारा प्रवास व इतर खर्च,<br>५. जिल्हा सेतु सोसायटीच्या परीक्षणासाठी होणारा प्रवास व इतर खर्च, (TA-DA) (महाराष्ट्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार)<br>६. राज्य सेतु सोसायटीच्या लेखापरीक्षणाचा होणारा खर्च, |

| | | |
|---|---|---|
| | | ७. राज्य सेतु सोसायटीच्या बैठकीसाठी चहापानाचा होणारा खर्च,<br>८. जिल्हा सेतु सोसायटीसाठी सुविधा पुरविण्याबाबत होणारा खर्च,<br>९. राज्य सेतु सोसायटी संबंधित आवर्ती खर्चाच्या इतर बाबी. |
| २. | राज्य सेतु सोसायटीसाठी अनावर्ती स्वरुपाचा खर्च | १. राज्य सेतु सोसायटीसाठी संगणक, लॅपटॉप व फर्निचर खरेदी,<br>२. राज्य सेतु सोसायटी संबंधितील न्यायालयीन प्रकरणावरील खर्च,<br>३. राज्य सेतु सोसायटी संबंधित अनावर्ती खर्चाच्या इतर बाबी |
| ३. | E- Governance प्रकल्प अंतर्गत येणारा खर्च | १. ई- गव्हर्नन्स धोरणात नमुद केलेले प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी तसेच राज्य सेतु सोसायटीच्या MOA मध्ये नमूद केलेल्या उद्दिष्टांसाठी सदर निधीचा उपयोग करता येईल.<br>२. ई- गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी आवश्यकतेनुसार तांत्रिक मनुष्यबळाची सेवा पुरविण्यासाठी सदर कर्मचाऱ्यांचे सेतु सोसायटीमार्फत वेतन अदा करणे. |

सदर शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेली असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३०७२००९३४८०११ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PARRAG JAIIN NAINUTIA

Digitally signed by PARRAG JAIIN NAINUTIA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRANSPORT AND PORTS DEPARTMENT, 2.5.4.20=ca5d2cef094adb5e2c21a7b30120daf2298bc38b570bce0790299cb4308a3f25, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FAAD89321F712F3B550E952380F8161D3819403554AC22C5BE2DB1F446F1B154, cn=PARRAG JAIIN NAINUTIA
Date: 2024.03.11 13:31:18 +05'30'

(श्री. पराग जैन नैनुटीया)
प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान (सा.प्र.वि.)
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (प्रशासकीय पुनर्रचना), मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हास्तरीय सेतु सोसायटी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.